दीनदयाळ अंत्योदय योजना सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षाकरीता राष्ट्रीय नागरी उपजिविका अभियान (NULM) अंतर्गत केंद्र-राज्य हिस्सा वितरीत करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक एनयुएलएम-२०२१/प्र.क्र.१२१/नवि-२०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च, २०२४

**वाचा :**

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४/अर्थ-३, दि.०८.१२.२०२३
३. केंद्र शासनाच्या गृहनिर्माण आणि नगर विकास मंत्रालयाचे आदेश क्र. F.No. K/२/२०२४-NULM-MoHUA/EFS/९१७३५५८, दि.३०.०३.२०२४
४. उपायुक्त, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई यांचे पत्र क्र. नपप्रस/NULM/ २०२३-२४/कक्ष-१०/केंद्र-राज्य शासन हिस्सा/२०९०, दि.३०.०३.२०२४.
५. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०२१/प्र.क्र.१२१/नवि-२०, दि. ०६.१०.२०२३
६. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक एनयुएलएम-२०२१/प्र.क्र.१२१/नवि-२०, दि. ०८.०१.२०२४
७. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक एनयुएलएम-२०२१/प्र.क्र.१२१/नवि-२०, दि. २८.०२.२०२४

**प्रस्तावना :-**

केंद्र शासन पुरस्कृत **"सुवर्ण जयंती शहरी रोजगार योजना"** ची पुनर्रचना करुन त्याचे दीनदयाळ अंत्योदय योजनेंतर्गत **"राष्ट्रीय नागरी उपजीविका अभियान"** (National Urban Livelihoods Mission) मध्ये रुपांतर करण्यात आले असून, राज्यामध्ये सदर अभियानाची सन २०१४-१५ पासून अंमलबजावणी करण्यात येत आहे. राज्यात सदर अभियान केंद्र-राज्य हिस्सा ६०:४० या प्रमाणात राबविण्यात येत आहे. सदर अभियानांतर्गत शहरी गरीब कुटुंबातील व्यक्तींना कौशल्य प्रशिक्षण देऊन रोजगाराची किंवा स्वयंरोजगाराची संधी उपलब्ध करुन देणे, नागरी बेघरांना निवाऱ्यांची सुविधा उपलब्ध करणे, नागरी भागातील फेरीवाल्यांच्या उपजिविका संबंधी समस्या सोडविणे, शहरी गरीब कुटुंबांच्या राहणीमानाचा दर्जा सुधारून शहरी दारिद्र्य कमी करणे, इत्यादी उपाययोजना या अभियानांतर्गत राबविण्यात येत असतात.

२. केंद्र शासनाने संदर्भ क्र. ३ येथील दि.३०.०३.२०२४ च्या आदेशान्वये सदर योजनेंतर्गत सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरिता केंद्र शासनाच्या हिश्याचा चौथा हप्ता एकूण रु.२९,६०,००,०००/- (रु.एकोणतीस कोटी साठ लक्ष फक्त) इतका निधी या योजनेसाठी राज्य शासनाला वितरीत केला असल्याचे कळविले आहे. राज्य शासनाच्या हिश्श्याची रक्कम रु.१९,७३,३३,०००/- (रु.एकोणीस कोटी त्र्याहत्तर लक्ष तेहतीस हजार फक्त) असा एकूण रु.४९,३३,३३,०००/- (अक्षरी रुपये एकोणपन्नास कोटी तेहत्तीस लक्ष तेहत्तीस हजार फक्त) इतका निधी सन २०२३-२०२४ या वित्तीय वर्षात वितरीत करणे अपेक्षित आहे. सदर केंद्र हिश्यापोटी एकूण रु.२९,६०,००,०००/- (रु.एकोणतीस कोटी साठ लक्ष फक्त) एवढा निधी उपलब्ध करुन देण्याबाबत राज्य अभियान संचालक, DAY NULM तथा आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई यांनी संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये विनंती केली आहे. तसेच सदर केंद्र शासन हिस्स्याची रक्कम रु.२९,६०,००,०००/- राज्य शासनाच्या एकत्रित निधी मध्ये जमा झाल्याबाबत वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने प्रमाणित केलेले आहे.

३. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात दीनदयाळ अंत्योदय योजना-राष्ट्रीय नागरी उपजीविका अभियानांतर्गत केंद्र हिस्सा रु.१३५,००,००,०००/- व समरुप राज्य हिस्सा रु.८९,००,००,०००/- इतकी मुळ अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. त्यानुसार मुळ तरतुदीपैकी शासन निर्णय संदर्भ क्र.५ अन्वये केंद्र हिस्सा रु.१६,२०,००,०००/- आणि राज्य हिस्सा रु.१०,८०,००,०००/- असा एकूण रु.२७,००,००,०००/- इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. तसेच शासन निर्णय संदर्भ क्र.६ अन्वये केंद्र हिस्सा रु.२०,५९,००,०००/- आणि राज्य हिस्सा रु.१३,७२,६७,०००/- असा एकुण रु.३४,३१,६७,०००/- (अक्षरी रुपये चौतीस कोटी एकतीस लक्ष सदुसष्ट हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. तसेच मूळ अर्थसंकल्पिय तरतूदीपैकी संदर्भ क्र.७ अन्वये केंद्र हिस्सा रु.२३,७०,००,०००/- व राज्य हिस्सा रु.१५,८०,००,०००/- असा एकूण रु.३९,५०,००,०००/- इतका निधी यापूर्वी वितरीत केला असुन त्यापैकी केंद्र हिस्सा रु.७४,५१,००,०००/- आणि समरुप राज्य हिस्सा रु.४८,६७,३३,०००/- इतका निधी बीम्स प्रणालीवर उपलब्ध आहे. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांचे मागणीनुसार केंद्र हिस्सा रु.२९,६०,००,०००/- (अक्षरी रुपये तेवीस कोटी सत्तर लक्ष फक्त) आणि समरुप राज्य हिस्सा रु.१९,७३,३३,०००/- (रु.एकोणीस कोटी त्र्याहत्तर लक्ष तेहतीस हजार फक्त) असा एकूण रु.४९,३३,३३,०००/- (अक्षरी रुपये एकोणपन्नास कोटी तेहत्तीस लक्ष तेहत्तीस हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

दीनदयाळ अंत्योदय योजना- राष्ट्रीय नागरी उपजिविका अभियानांतर्गत कार्यक्रमासाठी वित्त विभागाने उपलब्ध करून दिलेल्या तरतूदीमधून सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षाकरीता केंद्र हिस्सा रु.२९,६०,००,०००/- (रु.एकोणतीस कोटी साठ लक्ष फक्त) आणि समरुप राज्य हिस्सा रु.१९,७३,३३,०००/- (रु.एकोणीस कोटी त्र्याहत्तर लक्ष तेहतीस हजार फक्त) असा एकूण रु.४९,३३,३३,०००/- (अक्षरी रुपये एकोणपन्नास कोटी तेहत्तीस लक्ष तेहत्तीस हजार फक्त) इतका निधी आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय तथा राज्य अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी उपजीविका अभियान, वरळी, मुंबई यांना वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च "मागणी क्रमांक एफ-३, २२३०, कामगार, सेवायोजन व कौशल्य विकास, ०२, सेवायोजन सेवा, १०१ सेवायोजन सेवा, (०३), शहरी रोजगार व उपजिविका कार्यक्रम, (०३)(०१) दीनदयाळ अंत्योदय योजना-राष्ट्रीय नागरी उपजिविका अभियान (केंद्र पुरस्कृत योजना) (केंद्र हिस्सा ६० टक्के) (कार्यक्रम) ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२३०६०४७) आणि (०३)(०२) दीनदयाळ अंत्योदय योजना-राष्ट्रीय नागरी उपजिविका अभियान (केंद्र पुरस्कृत योजना) (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम) ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२३०६०५६)" या लेखाशिर्षाखालील सन २०२३-२०२४ च्या मंजूर व उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक दि.१२ एप्रिल, २०२३ व दि.०८ डिसेंबर, २०२३ मधील सूचनांना अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. याकरीता सहाय्यक आयुक्त (लेखा), नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, उपायुक्त, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. संबंधित लेखाशिर्षांतर्गत यावर्षी करण्यात आलेल्या मंजूर तरतुदीच्या अर्थसंकल्पीय निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही या अटीच्या अधीन राहून, हा निधी वितरीत करण्यात येत आहे.

४. असे प्रमाणित करण्यात येते की, सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३ व शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४/अर्थ-३, दि.०८.१२.२०२३ मधील सुचनांना अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३३११७२००६५०२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAVIN LAXMANRAO GHORPADE

Digitally signed by PRAVIN LAXMANRAO GHORPADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=3773d0994939fe4c68ea66a1b1b3e3e8a4b21a29f8cdf7aa1584dedd71e692a9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=018B791A8E24E41AC579C1B23910ADAF93ACE44F4DC0E21A5A6C5EE5CE8315ED, cn=PRAVIN LAXMANRAO GHORPADE
Date: 2024.03.31 17:29:28 +05'30'

**( प्रविण घोरपडे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत.**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उप मुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई
७. महालेखापाल (ले. व अ.) महाराष्ट्र -१ व २. मुंबई/नागपूर.
८. महालेखापाल (ले. प.) महाराष्ट्र -१ व २. मुंबई/ नागपूर.
९. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
१०. निवासी लेखापरीक्षक अधिकारी, मुंबई.
११. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१२. प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. कार्यासन (अर्थसंकल्प- ३)/(कोषा-५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. कार्यासन अधिकारी (नवि-४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवडनस्ती (नवि-२०)